**श्री. विलास पांडुरंग पाटील, नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित), सहाय्यक संचालक, नगर रचना, नाशिक शाखा, नाशिक यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :-पकानि-१५१५/१४६४/प्र.क्र.३००/नवि-२७,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

चौथा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

दिनांक :- ०७ नोव्हेंबर, २०१५.

**पहा :-** १. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिपीव्ही-१२/१०/३७७/प्र.क्र.१२२/१०/नवि-२७, दि.०७.०७.२०१०.

२. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यकारी आदेश क्र.आस्था/गट-अ/नर/पदो./प्रशा-१/४२४९, दि.०९.०७.२०१०.

३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/विपांपा/नर-प.का/प्रशा-१/५८१८, दि.१९.०९.२०१५.

**प्रस्तावना :-**

नगर विकास विभागाच्या **संदर्भ-१** येथील दि.०७.०७.२०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील तांत्रिक संवर्गातील रिक्त असलेली "नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित)" पदे नामनिर्देशनाने उपलब्ध झालेल्या उमेदवारांमधून भरण्याबाबत शासन आदेश निर्गमित करण्यात आले होते. त्यानुसार संचालनालयाच्या आस्थापनेवर पूर्वीपासून कार्यरत असलेले श्री. विलास पांडुरंग पाटील यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून "नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित)" (वेतनसंरचना रु.१५,६००-रु.३९,१००+ग्रेड पे रु.५,४००) पदावर दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीकरिता नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यात आली आहे. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या **संदर्भ-२** येथील दि.०९.०७.२०१० च्या कार्यकारी आदेशान्वये श्री. वि. पां. पाटील हे दि.१३.०७.२०१० (म.पू.) रोजी सहाय्यक संचालक, नगर रचना, लातूर शाखा, लातूर येथील "नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित)" रिक्त पदावर नामनिर्देशनाने रुजू झाले होते.

**०२.** श्री. वि. पां. पाटील, नगर रचनाकार यांनी त्यांच्या दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी दि.१३.०७.२०१० **ते** दि.१२.०७.२०१२ मध्ये खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आल्यानुसार एकूण ३३ दिवसांच्या कालावधीकरिता देय / अनुज्ञेय रजा उपभोगलेल्या आहेत.

| अ. क्र. | रजेचा कालावधी | | एकूण दिवस | रजेचे स्वरुप |
|---|---|---|---|---|
| | पासून | पर्यंत | | |
| १ | १८.०८.२०१० | २१.०८.२०१० | ०४ | अर्जित |
| २ | ०८.११.२०१० | १२.११.२०१० | ०५ | अर्जित |
| ३ | ०४.११.२०११ | ०७.०१.२०११ | ०४ | अर्जित |
| ४ | ११.०५.२०११ | १३.०५.२०११ | ०३ | अर्जित |
| ५ | २७.०६.२०११ | २९.०६.२०११ | ०३ | अर्जित |
| ६ | १६.०८.२०११ | १८.०८.२०११ | ०३ | अर्जित |
| ७ | ०७.१२.२०११ | ०९.१२.२०११ | ०३ | अर्जित |
| ८ | २०.०४.२०१२ | २३.०४.२०१२ | ०४ | अर्जित |
| ९ | ०५.०६.२०१२ | ०८.०६.२०१२ | ०४ | अर्जित |
| **एकूण :-** | | | **३३** | **दिवस** |

**०३.** सबब, श्री. वि. पां. पाटील, नगर रचनाकार यांचा दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी दि.१२.०७.२०१२ पासून पुढे ३३ दिवसांनी वाढून दि.१४.०८.२०१२ रोजी संपष्टात येईल.

**०४.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या **संदर्भ-३** येथील दि.१९.०९.२०१५ च्या पत्रान्वये श्री. वि. पां. पाटील, नगर रचनाकार यांचा दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी समाप्त करुन त्यांची "नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित)" पदावर नियमित नियुक्ती करण्याबाबतचा प्रस्ताव शासन मान्यतेस्तव सादर केलेला आहे.

**०५.** सबब, श्री. वि. पां. पाटील, नगर रचनाकार यांचा दि.१३.०७.२०१० (म.पू.) पासून सुरु झालेला दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी समाप्त करुन त्यांची "नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित)" (वेतनसंरचना रु.१५,६००-रु.३९,१००+ग्रेड पे रु.५,४००) पदावर नियमित नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

श्री. विलास पांडुरंग पाटील, नगर रचनाकार, सहाय्यक संचालक, नगर रचना, नाशिक शाखा, नाशिक हे त्यांच्या नियुक्ती आदेशातील अटी व शर्तीची तसेच अन्य सेवाविषयक बाबींची पूर्तता करित असून त्यांनी त्यांचा दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्याने महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम, ३९ अपवाद १ (ए) (एक) मधील तरतुदीनुसार त्यांचा परिविक्षा कालावधी दि.१४.०८.२०१२ (म.नं.) रोजी संपुष्टात आणून त्यांची

दि.१५.०८.२०१२ (म.पू.) पासून "नगर रचनाकार (गट-अ) / राजपत्रित)" (वेतनसंरचना रु.१५,६००-रु.३९,१००+ग्रेड पे रु.५,४००/-) पदावर नियमित नियुक्ती करण्यात येत आहे.

०२. सदरचे आदेश सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.एसआरव्ही-१०९४/१८३७/प्र.१८/९५/आठ, दि.२८ मार्च, १९९५ व सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.परिवि-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दि.२५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक २०१५११०७११४०३०७५२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dilip Sitaram Anerao

Digitally signed by Dilip Sitaram Anerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=26293749901b04ac59c3d853c2fdc32df6083d811902b3e94b40b924fa028887, cn=Dilip Sitaram Anerao
Date: 2015.11.07 12:39:30 +05'30'

( दि. सि. अणेराव )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

श्री. विलास पांडुरंग पाटील, नगर रचनाकार, सहाय्यक संचालक, नगर रचना, नाशिक शाखा, नाशिक यांना **(संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत)**

**प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीस्तव :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई / महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई / महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई / नागपूर.
४. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मध्यवर्ती इमारत, तळ मजला, पुणे. **(०३-प्रती)**
५. सह संचालक, नगर रचना, नाशिक विभाग, नाशिक.
६. सहाय्यक संचालक, नगर रचना, नाशिक शाखा, नाशिक.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक, जि. नाशिक.
८. निवडनस्ती / नवि-२७.

*****